**राज्य योजना सन २०२३-२४**

**निसर्ग संरक्षण व वन्यपशु व्यवस्थापन (कार्यक्रम) (२४०६ ०७७५) अंतर्गत चालू बाब प्रस्ताव.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी- ०६.२३/प्र.क्र. १८३/फ-१**

मंत्रालय, मुंबई ४०००३२.

दिनांक : ०८ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपुर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष- १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र. १९/५६६/२०२३-२४, दिनांक १५.१०.२०२३.
३. महसूल व वन विभाग, शासन पत्र क्रमांक :- डब्ल्यूएलपी- १०.२३/प्र.क्र. ३०८/फ-१, दिनांक ०३.११.२०२३
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.१९ (भाग-२)/७९२/२०२३-२४, दिनांक २१.११.२०२३.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.१९ (भाग-२)/७९२/२०२३-२४, दिनांक १२.१२.२०२३.
६. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.१९ (भाग-२)/८५४/२०२३-२४, दिनांक २७.१२.२०२३.
७. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक:- अर्थसं-२०२३/प्र.क्र. ४०/अर्थ-३, दिनांक ०५.०२.२०२४.
८. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक:- संकिर्ण-२०२४/प्र.क्र. १०/२४/कोषा. प्रशा.५, दिनांक १४.०२.२०२४.
९. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०४.०३.०२०२४.
१०. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष २२ (६)/योजना/प्र.क्र. १७/५४३९/२०२३-२४, दिनांक ०७.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता संदर्भ क्रमांक ९ च्या शासन निर्णयान्वये सुधारीत अंदाज निश्चित करण्यात आला आहे. त्यानुसार निसर्ग संरक्षण व वन्यपशु व्यवस्थापन (कार्यक्रम) (२४०६ ०७७५) या लेखाशिर्षाअंतर्गत एकूण रु. ४६२८.४० लक्ष नियतव्यय मंजूर करण्यात आला आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१, ७, ८ व ९ चे परिपत्रकान्वये महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२३ ला अनुसरुन सन २०२३-२४ या आर्थिक निधी वितरण व खरेदीच्या अनुषंगाने मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. त्या अनुषंगाने आतापर्यत निसर्ग संरक्षण व वन्यपशु व्यवस्थापन (कार्यक्रम) (२४०६ ०७७५) या लेखाशिर्षाअंतर्गत एकूण रु. ३४४५.०८ लक्ष निधी वितरीत करण्यात आला आहे.

४. संदर्भ क्रमांक ३ चे शासन पत्रान्वये सिंधुदूर्ग जिल्ह्यातील हत्तींच्या उपद्रवाबाबत कायमस्वरुपी उपाययोजना करण्यासंदर्भात शासन पत्र दिनांक ०३.११.२०२३ अन्वये सन २०२३-२४ ते सन २०२५-२६ या कालावधीकरता रु. २३१२.३२ लक्षच्या आराखड्यास मान्यता प्रदान करण्यात आली आहे व संदर्भ क्रमांक २, ४, ५, ६ व १० च्या पत्रान्वये सन २०२३-२४ करीता अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी निसर्ग संरक्षण व वन्यपशु व्यवस्थापन (कार्यक्रम) (२४०६ ०७७५) या योजनेअंतर्गत शासन मान्यतेसाठी सादर केलेल्या प्रस्तावांच्या अनुषंगाने शासनानेपुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाचे संदर्भ क्रमांक १, ७, ८ व ९ परिपत्रक विचारात घेता संदर्भ क्रमांक २, ४, ५, ६ व १० पत्रान्वये केलेली निधीची मागणी लक्षात घेऊन निसर्ग संरक्षण व वन्यपशु व्यवस्थापन (२४०६-०७७५) या लेखाशिर्षांतर्गत **रु. १०४३.६६ लक्ष** इतका निधी सोबत जोडलेल्या सहपत्रानुसार खालील अटी व शर्तींचे अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:

I. सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०२३-२४ मध्ये लेखाशिर्ष मुख्य लेखाशिर्ष २४०६- वनीकरण व वन्यजीवन, ११० - वन्यजीवाचे संवर्धन (००) (०२) निसर्ग संरक्षण व वन्यपशू व्यवस्थापन (२४०६ ०७७५) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

II. कार्यबाबींमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पध्दतीचा अवलंब करुन अथवा GeM पोर्टलवर आवश्यक ती प्रक्रिया राबवून खरेदीची प्रकिया करण्यात यावी. या अनुषंगाने वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक:- संकिर्ण-२०२४/प्र.क्र. १०/२४/कोषा. प्रशा.५, दिनांक १४.०२.२०२४ चे काटेकोर पालन करावे.

III. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची करण्यात यावा.

IV. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेत विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

V. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३, क्रमांक :- अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०५.०२.२०२४, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक:- संकिर्ण-२०२४/प्र.क्र. १०/२४/कोषा. प्रशा.५, दिनांक १४.०२.२०२४ व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०४.०३.०२०२४ चे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०५.०२.२०२४, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक:- संकिर्ण-२०२४/प्र.क्र. १०/२४/कोषा. प्रशा.५, दिनांक १४.०२.२०२४ व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०४.०३.०२०२४ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१११२५९३५५४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM
SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5712CE2D7A095C22E97EBB8F03C668B12EBA1DB0DD8E284883B7BD7FA74DA65D, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2024.03.11 13:16:49 +05'30'

**( सिध्देश सावर्डेकर )**
**विशेष कार्य अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, मुंबई. /पूर्व, नागपूर.
५. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), कोल्हापूर / चंद्रपूर.
६. वनसंरक्षक (प्रादेशिक), गडचिरोली / धुळे / अमरावती / नागपूर.
७. मुख्य वनसंरक्षक / वनसंरक्षक / उप वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक व्याघ्र प्रकल्प / पेंच नागपूर /सह्याद्री कोल्हापूर/ मेळघाट,अमरावती/ नवेगांव-नागझिरा, गोंदिया.
८. उप वनसंरक्षक (प्रादेशिक), यवतमाळ/ पांढरकवडा/ जळगाव/ ब्रम्हपूरी/ कोल्हापूर/ नागपूर/अकोला/वडसा/गडचिरोली.
९. उप वनसंरक्षक (वन्यजीव), पांढरकवडा/अकोला.
१०. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.
११. फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

********

महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी- ०६.२३/प्र.क्र. १८३/फ-१,
दिनांक :- ०८ मार्च, २०२४ सोतबतचे सहपत्र.

**(रु. लाखात)**

| वनविभाग | प्रस्तावाची रक्कम | आतापर्यंत वितरीत निधी | वितरीत रक्कम |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| उप वनसंरक्षक (प्रादेशिक), यवतमाळ | ७८.४९ | ३२.८० | ४५.६९ |
| उप वनसंरक्षक (प्रादेशिक), पांढरकवडा | २३७.३२ | ६५.३० | १००.०० |
| उप वनसंरक्षक (प्रादेशिक), जळगाव | ११८.५५ | ८०.०० | ३८.५५ |
| उप वनसंरक्षक (प्रादेशिक), ब्रम्हपूरी | ४७८.०८ | १६४.९३ | २८०.०० |
| उप वनसंरक्षक (प्रादेशिक), कोल्हापूर. | ४२६.७७ | ४००.०० | २००.०० |
| उप वनसंरक्षक (प्रादेशिक), सावंतवाडी | ३३५.९२ | | ०.०० |
| उप वनसंरक्षक (प्रादेशिक), सावंतवाडी | २६.७१ | | ०.०० |
| नवेगाव-नागझिरा व्याघ्र प्रकल्प | १५.६० | ०.०० | १५.६० |
| पेंच व्याघ्र प्रकल्प | ५९.१७ | ५०.०० | ९.१७ |
| सह्याद्री व्याघ्र प्रकल्प (चांदोली अभयारण्य) | ८९.५६ | ०.०० | ३०.०० |
| सह्याद्री व्याघ्र प्रकल्प (राधानगरी अभयारण्य) | ८६.४३ | ५८.०० | २०.०० |
| सह्याद्री व्याघ्र प्रकल्प (सागरेश्वर अभयारण्य) | १०५.७० | ५०.०० | २०.०० |
| उप वनसरंक्षक (प्रादेशिक), नागपूर. | १५८.०४ | १०.०० | ७०.०० |
| उप वनसरंक्षक (प्रादेशिक), अकोला. | ११८.२५ | १००.०० | १८.२५ |
| उप वनसरंक्षक (वन्यजीव), पांढरकवडा. | १०१.७५ | ७५.०० | २६.७५ |
| उप वनसरंक्षक (वन्यजीव), अकोला | ८१.६५ | ४०.०० | ४१.६५ |
| उप वनसरंक्षक (प्रादेशिक), पुणे | ४५.२८ | ०.०० | २८.०० |
| उप वनसरंक्षक (प्रादेशिक), वडसा | ११५.०० | ०.०० | १००.०० |
| उप वनसरंक्षक (प्रादेशिक), गडचिरोली | | | |
| एकूण | २६७८.२७ | ११२६.०३ | १०४३.६६ |

********